मराठी भाषिकांसाठी

# कोंकणी परिचय






प्रा. प्रियदर्शिनी सु. तडकोडकार
प्रा. आशा मणगुतकार

मराठी भाषिकांसाठी :

# कोंकणी परिचय



लेखिका :
प्रा. प्रियदर्शिनी सुधीर तडकोडकर
प्रा. आशा अशोक मणगुतकार







गोवा कोंकणी अकादेमी

मराठी भाषिकांसाठी :
कोंकणी परिचय

लेखिका : प्रा. प्रियदर्शिनी सु. तडकोडकार
प्रा. आशा अ. मणगुतकार

प्रकाशन क्र. 85



प्रथम आवृत्ती :
2006

प्रकाशक :
गोपाळकृष्ण पाडगांवकार
सचिव,
गोवा कोंकणी अकादेमी
243, पाटो कॉलनी,
पणजी, गोवा - 403 001

मुखपृष्ठ :
वासुदेव यशवंत दिवकार

अक्षरजुळणी :
ज्योती गांवकार

मुद्रक :
रुतू ऑफसेट,
वळवय, फोंडें - गोवा

मोल : रू. 35/-

KONKANI PARICHAY for
Marathi Speakers

written by
Priyadarshani S. Tadkodkar
Asha A. Mangutkar

Publication No. 85





First Edition:
2006

Published by :
Gopalkrishna Padgaonkar
Secretary,
Goa Konkani Akademi
243, Patto Colony,
Panaji, Goa. 403001

Cover Design :
Vasudev Yeshwant Divkar

Typesetting :
Jyoti Gaonkar

Printed by :
Rutu Offset,
Volvoi, Ponda - Goa.

**Price : Rs. 35/-**

# अनुक्रमणिका





## गोवा कोंकणी अकादेमीच्या वतीने...

इ.स. 2004 आणि 2005 अशी दोन वर्षे गोवा कोंकणी अकादेमीच्यावतीने पुणे येथील नामवंत पुस्तक विक्रेते रसिक प्रकाशन व पुणे बुक फेअर यांनी आयोजित केलेल्या ग्रंथप्रदर्शनात भाग घेतला. पुस्तकांच्या विक्रीपेक्षाही कोंकणी पुस्तकांचे प्रदर्शन घडवून कोंकणीविषयीची माहिती लोकांना करून द्यायची हा त्यामागील महत्वाचा उद्देश होता.

मराठी भाषिक किती आस्थेने ह्या प्रदर्शनाकडे पाहतील अशी अंधुक शंका होती पण तसे काही झाले नाही. आमचा उद्देश सफल झाला. अनेकांनी कोंकणी दालनाला आत्मीयतेने भेट देऊन कोंकणी भाषा शिकण्यासाठी लागणाऱ्या पुस्तकांविषयी चौकशी केली व तशी पुस्तके हवीत अशी मागणीही केली. त्या मागणीमुळेच हे 'कोंकणी परिचय' पुस्तक आज तयार होत आहे. त्यामुळे पुस्तक निर्मितीचे खरे श्रेय पुणे नगरींतल्या नेहमी विद्येच्या व नव्याच्या शोधात असलेल्या ज्ञानपिपासू मराठी भाषिकांनाच द्यावे लागेल.

'कोंकणी परिचय' हे पुस्तक मराठीतून कोंकणी भाषा शिकू पाहणाऱ्या प्रत्येकासाठी उपयुक्त आहे. कोंकणी भाषेची, व्यवहारापुरती जुजबी ओळख व्हावी इतकाच त्या मागचा मर्यादित हेतू आहे.

कोंकणी –मराठी मधला ऐतिहासिक बोली–भाषा वाद मराठी भाषिकांना परिचित आहे; परंतु कोंकणी भाषेला 1975 साली केंद्रिय साहित्य अकादेमीची मान्यता लाभली. नंतर 1987 साली ती गोवा राज्याची राजभाषा झाली आणि 1992 साली भारतीय संविधानाच्या आठव्या परिशिष्टात तिचा समावेश झाला, त्यामुळे हा बोली–भाषा वाद संपुष्टात आला.

गोवा कोंकणी अकादेमीने प्रा. तडकोडकार आणि प्रा. आशा मणगुतकार यांच्या सहकार्याने ह्या पुस्तकाची निर्मिती करून घेतली. दोघीनी ह्या पुस्तकातून आपले कौशल्य पणाला लावण्याचा प्रामाणिकपणे प्रयत्न केला आहे. या पुस्तकाच्या निर्मितीत श्री. सुरेश बोरकार यांचाही फार महत्वाचा हातभार लागलेला आहे. त्यांनी वेळोवेळी योग्य त्या सूचना करून हे पुस्तक निर्दोष करण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्यासाठी अकादेमी त्यांची आभारी आहे.

मराठी भाषिकांसाठी तयार केलेल्या 'कोंकणी परिचय' ह्या पुस्तकाचा हेतू सफल होईल अशी अशा वाटते. या 'कोंकणी परिचय' पुस्तक प्रकाशनाच्या मालिकेत इतर भाषिकांसाठी अशीच मार्गदर्शक स्वरूपाची पुस्तके तयार करण्याचा अकादेमीचा मानस आहे.

**पुंडलीक नायक**
अध्यक्ष
गोवा कोंकणी अकादेमी

# विषय प्रवेश करताना

हे पुस्तक तयार करताना मराठी भाषकाच्या आकलनाची कुवत किमान अठरा वर्षांची व शैक्षणिक पात्रता किमान आठव्या इयत्तेची मानली आहे. या इयत्तेत उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्याला शब्द, वाक्य, वाक्याची रचना, त्याचा अर्थ, काळ इ. ची सामान्य माहिती झालेली असते. याहून अधिक माहितीची व व्याकरणाच्या परिभाषेची अपेक्षा आम्ही बाळगलेली नाही. तेवढ्या ज्ञानावर 'कोंकणी परिचय'ची रचना केलेली आहे असे असूनही सिध्दान्तन व उपयोजन अशा बैठकींवर या पुस्तकाची मांडणी झाली आहे.

'कोंकणी' व 'मराठी' ह्या भाषा एकाच 'आर्य' भाषिक कुलापासून उत्पन्न झालेल्या आहेत. याचाच अर्थ त्या दोन्हींत अनेक ठिकाणी साम्य आहे. म्हणून अभ्यासकांना मराठीच्या आधारे कोंकणी शिकणे सहज शक्य आहे. मात्र अभ्यासकाने याचे भान ठेवले पाहिजे की हा फक्त आधार आहे. पण नंतरची पावले त्यानेच टाकली पाहिजेत. त्यासाठी सरावाची अत्यंत आवश्यकता आहे. या पुस्तकात दिलेल्या वेगवेगळ्या संवादांच्या आधाराने व मागे दिलेल्या शब्दांच्या आधारे त्याने तो करावा. शिवाय पुस्तकाच्या शेवटी दिलेल्या काही उताऱ्यांचा सराव करून आपणच केलेल्या अभ्यासाशी तो ताडून पहावा व त्याप्रमाणे योग्य ती सुधारणा करून घ्यावी.

मराठी भाषकाला कामचलाऊ कोंकणी आली पाहिजे, त्यामुळे कोंकणी भाषिक माणसाशी त्याला कोंकणीतून व्यवहार करता येईल. कोंकणी लिखाण वाचता, समजता येईल हे उद्दिष्ट ह्या पुस्तकाच्या लेखनामागे आहे. मराठी माणसाला कोंकणीची लिपी स्वतंत्रपणे शिकण्याची गरज नाही. कारण मराठी व कोंकणी देवनागरी लिपीत लिहिल्या जातात. गुजराती, कन्नड, बंगाली किंवा दक्षिण भाषिक माणसाला ती शिकावी लागते.

मात्र काही स्वरांचे कोंकणीत खास उच्चार आहेत. ते समजून घ्यावे लागतील. शिवाय कोंकणीत अनुनासिक उच्चारांचेही प्राबल्य आहे. त्यामुळे अनुस्वारांचा वापर व उच्चार कोंकणीत योग्य रितीने व्हावा यासाठी विशेष लक्ष द्यावे लागेल. शब्दांची मांडणी काही ठिकाणी वेगळी आहे. तर काही ठिकाणी मराठी व कोंकणी शब्द एक असला तरी त्याचा अर्थ वेगळा होतो. उदा. कोंकणींत 'दिलगिरी' व्यक्त करण्यासाठी 'खंत भोगता' अशी शब्दरचना केली जाते. 'काप' हा शब्द 'कापणे' असा क्रियापद







होऊन मराठीत येतो. त्याचा अर्थही 'कापणे' असा होतो. पण कोंकणीत गोड पदार्थाची एखादी 'वडी' म्हणजे 'काप' होय. मराठीत ज्याला सांडगा असे म्हणतात त्याला कोंकणीत 'वडी' म्हणतात. किंवा 'चार' हा शब्द मराठीत संख्यावाचक आहेच, त्या शिवाय त्याचा दुसरा अर्थ 'खाववणे' असा होतो. मात्र कोंकणीत तो संख्यावाचक आहेच, त्या शिवाय त्याचा अर्थ 'हिरवे गवत' असा कधी होतो तर कधी फणसाच्या आतील तंतूमय पदार्थ असाही होतो. गोमंतकातील 'गांवकारी पध्दती'तील जे भागधारक असतात त्यांचा वार्षिक 'जण' (लाभांश) दिला जातो. तर मराठीतील 'जण' या शब्दास 'जाण' असा समानार्थक शब्द उपयोजिला जातो, हे लक्षणीय होय. मराठीतला 'वेळ' कोंकणीत कधी दर्याची पुळण होते तर कधी 'बांबू'चा एक भाग होतो. कोंकणीत बोलत असताना 'खंत' हा शब्द 'डाग' या मराठीतील समानार्थ असलो नपुसकलिंगी शब्द उपयोजिला जातो. आणि मराठीतील 'खत' या शब्दास कोंकणीत 'सारें' (न.पुं.) हा समानार्थ शब्द उपयोजिला जातो, याविषयीची जाणीव ठेवणे आवश्यक आहे.

अशा काही मजेदार गोष्टी ही भाषा शिकताना आपल्याला आढळून येतील. वाक्य रचनेत शब्दांचा एकमेकांशी असलेला संबंध समजून घ्यावा लागेल. या गोष्टींचे आकलन झाल्याने मराठी वाक्याचे कोंकणीकरण करता येईल व कोंकणी वाक्यांचा, शब्दांचा अर्थ कळायला मदत होईल, ज्यायोगे एखाद्या कोंकणी भाषिक माणसाकडे मराठी माणसाला कोंकणीतून संभाषण करणे शक्य होईल.

यासाठी अगदी प्राथमिक स्तरावरील व्याकरण देण्याचा प्रयत्न इथे केला आहे. कोंकणीत काही स्वरांचे उच्चार विशिष्ट पध्दतीने होतात. ती कोंकणीची खासियत आहे. या उच्चारांकडे विशेष लक्ष देणे आवश्यक आहे. हे उच्चार दाखवण्यासाठी वेगळी मात्रा वा चिन्ह नाही. त्यामुळे सतत बोलण्याच्या सरावानेच हे उच्चार शक्य होतील. तसेच पुस्तकाच्या शेवटी काही कोंकणी शब्दार्थ मराठी अर्थासह देण्याचा प्रयत्न केला आहे. त्याच बरोबर कोंकणी-मराठीतले काही निवडक उतारेही दिलेले आहेत, ज्या योगे भाषेचा परिचय व अभ्यास व्यवस्थितपणे करणे एखाद्याला शक्य होईल.

या पुस्तकाची मांडणी करण्यासाठी कोंकणीचे वैथ्याकरणी श्रीयुत सुरेश बोरकार यांचे विशेष मार्गदर्शन झाल, याविषयीची कृतज्ञपणे नोंद करायलाच हवी.

**प्रा. प्रियदर्शिनी सुधीर तडकोडकार**
**प्रा. आशा अशोक मणगतकार**

प्रकरण 1 :

## लिपी परिचय आणि उच्चार

कोंकणी वर्णमाला मराठी वर्णमालेसारखीच आहे. त्यामुळे मराठीत असलेले 'अ' पासून 'ळ' पर्यंत सर्व वर्ण समान आहेत, आणि त्यांचे उच्चार काही अपवाद सोडल्यास मराठीतल्या प्रमाणेच होतात.
कोंकणी स्वर खालील प्रमाणे :

*अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ऐ, ओ, औ*

कोंकणीत 'ऋ' हा वर्ण नाही. पण हा स्वर संस्कृत शब्दान्वये येतो. मात्र कोंकणीत या स्वराच्या ऐवजी *'री'* व *'रू'* ही रूपेच प्रचलित आहेत. उदा. 'ऋषी', 'ऋचा', 'ऋतू', 'ऋण' हे शब्द *'रुशी', 'रुचा', 'रुतू'* व *'रीण'* अशा तऱ्हेने लिहितात व उच्चारले जातात.

कोंकणी व्यंजने खालील प्रमाणे :

*क्, ख्, ग्, घ्, ङ्*
*च्, छ्, ज्, झ्, ञ्*
*ट्, ठ्, ड्, ढ्, ण्*
*त्, थ्, द्, ध्, न्*
*प्, फ्, ब्, भ्, म्*
*य्, र्, ल्, व्, श्, ष्, स्, ह्, ळ्*

मराठीत ज्या प्रमाणे व्यजनाच्या आकाराकरिता काना, इकाराकरिता वेलांटी, उकारासाठी ऊकार, मात्रा वापरल्या जातात व बाराखडी बनते तशीच पध्दत कोंकणीतही प्रचलित आहे. त्यासाठी 'क' ची बाराखडी उदाहरणासाठी इथे पाहू :

*क, का, कि, की, कु, कू, के, कै, को, कौ, कं*

## प्रकरण 2 :

# संख्या

कोंकणीत 1 ते 100 अंक अक्षरात खालील प्रमाणे लिहिले व उच्चारले जातात.

| एक-1 | एकवीस-21 | एकेचाळीस-41 | एकसठ-61 | एक्यांयशीं-81 |
|---|---|---|---|---|
| दोन-2 | बावीस-22 | बेचाळीस-42 | बासठ-62 | ब्यांयशीं-82 |
| तीन-3 | तेवीस-23 | त्रेचाळीस-43 | त्रेसठ-63 | त्र्यांयशीं-83 |
| चार-4 | चोवीस-24 | चवेचाळीस-44 | चवसठ-64 | चवद्यांयशीं-84 |
| पांच-5 | पंचवीस-25 | पंचेचाळीस-45 | पांसठ-65 | पंच्यांयशीं-85 |
| स-6 | सव्वीस-26 | शेचाळीस-46 | सांसठ-66 | शांयशीं-86 |
| सात-7 | सत्तावीस-27 | सत्तेचाळीस-47 | सातसठ-67 | सत्यांयशीं-87 |
| आठ-8 | अठ्ठावीस-28 | अठ्ठेचाळीस-48 | आठसठ-68 | अठ्ठ्यांयशीं-88 |
| णव-9 | एकुणतीस-29 | एकुणपन्नास-49 | एकुणसत्तर-69 | एकुण्णव्वद-89 |
| धा-10 | तीस-30 | पन्नास-50 | सत्तर-70 | णव्वद-90 |
| इकरा-11 | एकतीस-31 | एकावन-51 | एक्यात्तर-71 | एक्याण्णव-91 |
| बारा-12 | बत्तीस-32 | बावन-52 | ब्यात्तर-72 | ब्याणव-92 |
| तेरा-13 | तेत्तीस-33 | त्रेपन्न-53 | त्र्यात्तर-73 | त्र्याण्णव-93 |
| चवदा-14 | चवतीस-34 | चवपन-54 | चवद्यात्तर-74 | चवद्याण्णव-94 |
| पंदरा-15 | पस्तीस-35 | पंचावन-55 | पंच्यात्तर-75 | पंच्याण्णव-95 |
| सोळा-16 | छत्तीस-36 | छापन्न-56 | शात्तर-76 | शाण्णव-96 |
| सतरा-17 | सात्तीस-37 | सत्तावन-57 | सत्यात्तर-77 | सत्याण्णव-97 |
| अठरा-18 | आठ्ठीस-38 | अठ्ठावन-58 | अठ्ठ्यात्तर-78 | अठ्ठ्याण्णव-98 |
| एकुणीस-19 | एकुणचाळीस-39 | एकुणसाठ-59 | एकुणअंयशीं-79 | णव्याण्णव-99 |
| वीस-20 | चाळीस-40 | साठ-60 | अंयशीं-80 | शंबर-100 |

प्रकरण 3:

## उच्चार

(कोंकणीतल्या काही स्वरांचे उच्चार)

कोंकणीत 'अ' स्वर तीन प्रकारे उच्चारला जातो.

1. *'अ'* चा उच्चार काही ठिकाणी पूर्णपणे केला जातो. पूर्ण उच्चार उदा. *नदर, घर, कडी, कानस, बरप* इत्यादी. वरील *'कानस'* ह्या शब्दात क्+आ, न्+अ व स्+अ यातील पहिल्या दोनांचा उच्चार पूर्णपणे होतो. 'स' चा होत नाही. तर *'घर'* हा शब्द घ्+अ+र्+अ असा बनला आहे. त्यात पहिला वर्णातला 'अ' पूर्णपणे उच्चारला जातो तर दुसऱ्या वर्णातला 'अ' (र्+अ) चा उच्चार केला जात नाही. म्हणून ह्या शब्दाचा उच्चार घर् असा होतो. लिहिताना मात्र तो शब्द *'घर'* असाच लिहिला जातो.

2. 'अ' चा उच्चार काही शब्दात पूर्णपणे केला जात नाही. उदा. *कान, गोड, दीस* या ठिकाणी अन्त्य 'अ' चा उच्चार केला जात नाही.

3. उपान्त्य 'अ' चा उच्चार दीर्घ होतो. उदा. *'पणऽस'*. याठिकाणी 'पणस' हा शब्द प्+अ+ण्+अ+स्+अ असा असून त्यातील 'ण्' तल्या 'अ' चा उच्चार दीर्घ होतो.

4. कोंकणीत स्वरांच्या उच्चारांची काही विशिष्ट पध्दत आहे. त्यामुळे या उच्चारांकडे लक्ष देणे महत्वाचे आहे. अर्थात सततच्या सरावाने व अभ्यासाने ते आत्मसात होईल. तसेच कोंकणीत स्वरांचा उच्चार बदलल्यास त्या शब्दाचा अर्थ बदलतो. 'ए' आणि 'ओ' ह्या स्वरांचे उच्चार मराठीतल्या उच्चाराप्रमाणे असूनही ते वेगळ्या प्रकारे म्हणजे

अर्धचंद्राच्या उच्चाराप्रमाणे उच्चारले जातात.

उदा. *देव-दॅवाक, बेल-बॅलाक, घोव (नवरा)-घॉवाक, ढोल-ढॉलार, चोर - चॉराक* या सर्व वर्णाचे उच्चार सरावानेच समजतात. त्यासाठी प्रत्येकाने प्रयत्न केले पाहिजेत. कोंकणीत 'ए' व 'ओ' या स्वरांचे उच्चार नेहमीच्या उच्चाराबरोबरच एका वेगळ्या प्रकारेही होतो. या उच्चारांचे हे वैशिष्ट्य कोंकणी भाषेचा वेगळेपणा दाखवते. अशा तऱ्हेच्या उच्चारांना कोंकणीत *'उकते'* म्हणजेच मराठीत 'विवृत' उच्चार असे म्हणतात. मात्र हे शब्द लिहिताना नेहमीप्रमाणेच लिहिले जातात. उदा. *'मोल'* म्हणजे किंमत हा शब्द कोंकणीत उच्चारताना *'मॉल'* असा उच्चारला जातो. कारण यातल्या 'मो' मधला 'ओ' हा स्वर विवृत आहे. त्यामुळे हा 'ओ' असे उच्चारताना आपले ओठ उघडावे वा विलग करावे लागतात. तेव्हाच त्याचा उच्चार 'ऑ' असा होईल. त्याचप्रमाणे *'तेल'* हा शब्द कोंकणील *'तॅल'* असा उच्चारला जातो. म्हणजे 'ते' तल्या 'ए'चा उच्चार 'ऍ' असा विवृत करावा लागतो. याचप्रकारे 'ओ' ह्या स्वराचाही उच्चार विवृत होतो. उदा. *'बरोवप'* ह्यातल्या 'ओ' चा उच्चार विवृत करावा लागतो. *हांसोवप, उलोवप, खेळोवप* ह्या शब्दातल्या 'ओ' चा उच्चार विवृतच होतो. म्हणजे त्या 'ओ' चा उच्चार 'ऑव' असा करावा लागतो. 'ए' ह्या स्वराचा उच्चार 'ऍ' असा विवृत करावा. उदा. *'केळें'* ह्या शब्दातल्या 'ए' चा उच्चार 'ऍ' असा केल्याने *'कॅळॅं'* असा विवृत उच्चार ह्या शब्दाचा होईल. त्याचप्रमाणे *खार, सुण* अशा अन्य शब्दांतील 'ए' चा उच्चार विवृत म्हणजे 'ऍं' असाच करावा.

5. कोंकणीत अनुनासिक उच्चार फार महत्वाचे आहेत. हे उच्चार दाखवण्यासाठी अक्षराच्या शीर्षावर एक टिंब (˙) दिले जाते. उदा. 'अ' च्या शीर्षावर टिंब दिल्यास त्याचा अनुनासिक उच्चार 'अं' असा होतो. ह्याच पध्दतीने कोंकणीत *आं, ईं, उं, ऊं, एं, ऐं, ओं, औं, कं,*

*चं, टं, तं, पं, यं, रं, लं, वं, शं, सं, हं, ळं* यांचेही अशा तऱ्हेचे उच्चार होतात. या अनुस्वारांचा उच्चार कोंकणीत स्पष्टपणे होणे आवश्यक आहे. कारण यातच कोंकणीचे वैशिष्ट्य आहे व तिच्या नादमधुरतेची गोडी यातूनच व्यक्त होते.

6. काही वेळा कोंकणीतल्या अनुस्वारांचा उच्चार परसवर्णाच्या नियमानुसार ङ्, न्, ण्, म् असा होतो. यांना अनुनासिक व्यंजने म्हणतात. उदा. अनुस्वारापुढील वर्ण क्, ख्, ग्, घ् ह्यापैकी कोणताही असल्यास त्या अनुस्वाराचा उच्चार 'ङ्' होतो.

   उदा. *रंग* (रङ्ग), *हांकां* (हांङ्कां) इत्यादि.

   अनुस्वारापुढील वर्ण 'च, छ, ज, झ' वा 'त, थ, द, ध' यापैकी कोणताही असल्यास त्या अनुस्वाराचा उच्चार अनुक्रमे ञ् व न् होतो.

| उदा. | *हांचो* | – | हाञ्चो |
|---|---|---|---|
| | *तांचो* | – | ताञ्चो |
| | *रूंद* | – | रून्द |
| | *गंद* | – | गन्द |

अनुस्वारापुढील वर्ण जर 'ट, ठ, ड, ढ' यापैकी कोणताही असल्यास त्या अनुस्वाराचा उच्चार 'ण्' होतो.

| उदा. | *थंडी* | – | थण्डी |
|---|---|---|---|
| | *बंडी* | – | बण्डी |
| | *हिंड* | – | हिण्ड |
| | *दिंडी* | – | दिण्डी |

अनुस्वारापुढील वर्ण जर 'प, फ, ब, भ' यापैकी कोणतेही असल्यास त्या अनुस्वाराचा उच्चार म् होतो.

| उदा. | *पंप* | – | पम्प |
|---|---|---|---|
| | *झुंबर* | – | झुम्बर |
| | *चंपा* | – | चम्पा |
| | *अंबा* | – | अम्बा |

भारतातील अन्य काही भाषांमध्येही ए, ओ, ऐ, चे विवृत उच्चार आहेत. पण हे उच्चार दाखवण्यासाठी वेगळे चिन्ह मात्र नाही. त्या त्या लोकांप्रमाणे कोंकणी भाषिक लोकांच्याही जिभेवर लहानपणापासून हे उच्चार घोळत असल्याने त्यांना ते ओळखायला शिकवायची गरज भासत नाही. पण मराठी भाषकांना मात्र ते शिकून घेणे महत्वाचे व आवश्यक आहे.

या उच्चारांचा परिचय व्हावा व त्यांचा अभ्यास अधिक व्हावा म्हणून पुढे काही शब्द त्यांच्या कोंकणी उच्चारांसह दिले आहेत. त्याशिवाय हे शब्द वापरून काही वाक्येही सरावासाठी दिली आहेत. भाषा जसजशी आत्मसात होईल तसतशी  या विवृत उच्चाराच्या शब्दांची सवय होईल यात शंका नाही.

## ‘ए’ चे विवृत (उगते) उच्चारी शब्द

| | | |
|---|---|---|
| *उमथे* | – | उमथॅ |
| *काडले* | – | काडलॅ |
| *खाले* | – | खालॅ |
| *गडे* | – | गडॅ |
| *गळे* | – | गळॅ |
| *गेले* | – | गेलॅ |
| *ते* | – | तॅ |
| *तेल* | – | तॅल |
| *हे* | – | हॅ |
| *दोळे* | – | दोळॅ |
| *पडले* | – | पडलॅ |
| *पळे* | – | पळॅ |
| *सुळे* | – | सुळॅ |
| *गुळे* | – | गुळॅ |
| *पेले* | – | पॅलॅ |
| *गबे* | – | गबॅ |
| *डबे* | – | डबॅ |
| *रेडे* | – | रॅडॅ |
| *फेणे* | – | फॅणॅ |
| *तिणे* | – | तिणॅ |
| *देव* | – | दॅव |

## 'एँ' चे विवृत (उगते) उच्चारी शब्द

(अनुनासिक)

| | | |
|---|---|---|
| *केळें* | – | कॅळँ |
| *खारें* | – | खारँ |
| *खेतें* | – | खॅतँ |
| *तवशें* | – | तवशँ |
| *तळें* | – | तळँ |
| तांबें | – | तांबँ |
| *दातें* | – | दातँ |
| *नुस्तें* | – | नुस्तँ |
| *पातें* | – | पातँ |
| *पिसोळें* | – | पिसोळँ |
| *भुरगें* | – | भुरगँ |
| *मानगें* | – | मानगँ |
| *वागोळें* | – | वागोळँ |
| *वांयगें* | – | वांयगँ |
| *सवणें* | – | सवणँ |
| *व्हडें* | – | व्हडँ |
| *गेळें* | – | गॅळँ |
| *मानगें* | – | मानगँ |
| *कारातें* | – | कारातँ |

## ‘ओ’ चे विवृत उच्चार असलेले काही शब्द

(ओ चा उच्चार ऑ)

| | | |
|---|---|---|
| *अठरावो* | – | अठरावॉ |
| *अळशिकावणो* | – | अळशिकावणॉ |
| *आखाणो* | – | आखाणॉ |
| *आत्मो* | – | आत्मॉ |
| *आदलो* | – | आदलॉ |
| *उगतो* | – | उगतॉ |
| *उफेलो* | – | उफॅलॉ |
| *उशिकांडो* | – | उशिकांडॉ |
| *कळो* | – | कळॉ |
| *कावळो* | – | कावळॉ |
| *कुडको* | – | कुडकॉ |
| *खिळो* | – | खिळॉ |
| *गुंडो* | – | गुंडॉ |
| *घराबो* | – | घराबॉ |
| *चवथो* | – | चवथॉ |
| *जाणटो* | – | जाणटॉ |
| *डबो* | – | डबॉ |
| *निळो* | – | निळॉ |
| *धोलयो* | – | धोलयॉ |

## ‘ओ’ चे ( ॅं ) अनुनासिक विवृत उच्चार

(ओं चा विवृत ओं)

| | | |
|---|---|---|
| कोंक | – | काँक |
| कोंड | – | काँण्ड |
| तोंक | – | ताँक |
| तोंड | – | ताँड |
| सोंड | – | साँड |
| फोंड | – | फाँड |

# ‘ए’ चा विवृत उच्चार

1. केळे कुठे ठेवले आहेस?
   *केळें (केळॅ) खंय दवरलां?*

2. गोव्यात कालवां नावाचा माशांचा एक प्रकार खातात.
   *गोंयां कालवां (कालवाँ) खातात.*

3. कसले मासे आणले आहेत आज?
   *आयज कसलें (कसलॅ) नुस्तें (नुस्तँ) हाडलां (हाडलाँ)?*

4. हे रक्तदान कुणी केले?
   *हें (हँ) रक्तदान कोणे केलें (केलँ)?*

5. फूल कुणाकडून आणले?
   *फूल कोणाकडल्यान हाडलें (हाडलँ)?*

6. किती भुंकत होती कुत्री?
   *सुणे (सुणँ) सारकें भोंकताले.*

7. पाणी सोसवेनासे  गरम झाले आहे.
   *उदक  सोसूंक जायना इतलें (इतलँ) हून जालां.*

8. मूल मातीत खेळू लागले.
   *भुरगें (भुरगँ) मातयेंत खेळूंक लागलें (लागलँ).*

9. आजोबांचा चष्मा काल कुठेतरी हरवला.
*आज्याचें (आज्याचँ) वक्ल काल खंयतरी शॅणलें (शेणलँ).*

10. शूऽ! ती खुर्ची हालवू नकोस.
*शूऽ! तें (तँ) कदॅल हालोवं नाका.*

11. गोव्याचे संगीत ऐकायला फार गोड लागते.
*गोंयचें (गोंयचँ) संगीत आयकूंक भौच गोड!*

12. ती होडी कालपासून किनाऱ्यावरच आहे.
*तें (तँ) व्हडें (व्हडँ) कालसावन तडीकच आसा.*

13. घळीतील आंब्याची झाडे कुणी कापली?
*गाळींतली आंब्याची झाडां कोणें (कॉणँ) कापलीं? गाळींतले आंबे (आंबॅ) कोणे कापले?*

14. रसना गाडीखाली कशी आली?
*रसना गाडयेपोंदा कशें (कशँ) पडलें (पडलँ)?*

15. महेशाचे नाक सुजलेलेच होते.
*महेशाचें (महेशाचँ) नाक सुजिल्लेंच (सुजिल्लँच) आसलें (आसलँ).*

16. मला पसायदान द्यावे.
*म्हाका पसायदान दिवचें (दिवचँ).*

17. पक्षी क्षितीजाकडे गेला.
*शेवणें (शेवणँ) मळबाचे धारेर गेलें (गेलँ).*

18. त्यांनी रात्रीचेच पळून जाण्याचे ठरविले.
*तांणी रातयांच फुज्यो मारपाचें थारायलें (थारायलँ).*

19. पीन कुठे ठेवली?
*लीग खंय दवरलें (दवरलँ)?*

20. माझे पेन कालच हरवले.
*म्हजें (म्हजॅ) पेन (पॅन) कालच शेणलें (शेणलँ).*

## ‘ओ’ स्वराचा कोंकणीतला विवृत (उगतो) उच्चार दाखवणारी वाक्ये

1. तो आला का?
   *तो आयलो ? (आयलॉ तॉ )*

2. हो. आला.
   *हय. आयलो (आयलॉ).*

3. भोपळा कुठे ठेवला आहेस?
   *दुदी खंय दवरला?*

4. कालच मामा घरी गेला.
   *मामा कालूच  घरा गेलो (गेलॉ).*

5. आंबा खाल्लास काय?
   *आंबो खाल्लो? (आंबॉ खाल्लॉ?)*

6. होय, खाल्ला.
   *हय, खालो. (खालॉ)*

7. कुत्रा कधी मेला?
   *सुणो (सुणॉ) केन्ना मॅलॉ?*

8. अध्यक्ष कधी येणार?
   *अध्यक्ष केन्ना येतलो? (येतलॉ)*

9. तुझ्या साडीचा निळा रंग मला फार आवडतो.
*तुजे साडयेचो (साडयेचॉ) निळो (निळॉ) कोर म्हाका भौच आवडटा.*

10. झाडांच्या पानांचा हिरवा रंग आता गडद व्हायला लागलाय.
*रूखावळीच्या पानांचो (पानांचॉ) पांचवो (पांचवॉ) रंग आतांच गाट जावपाक लागलो (लागलॉ).*

11. 'ऋग्वेद' कुणी रचला?
*'ऋग्वेद' कोणे रचलो? (रचलॉ) ?*

12. इथला भिकारी कुठे गेला?
*हांगासल्लो भिकारी खंय गेलो (गेलॉ) ?*

13. रानात कोल्हा रहात होता.
*रानांत कोलो (कोलॉ) रावतालो (रावतालॉ).*

14. आमच्या अंगणात शिमग्याचे मंडळ नाचून गेले.
*आमच्या आंगणांत शिगम्याचो (शिगम्याचॉ) मेळ नाचून गेलो (गेलॉ).*

15. 'ज्ञानेश्वरी'चा आजच्या काळाशी संबंध कसा लावावा बरे?
*'ज्ञानेश्वरी'चो (ज्ञानेश्वरीचॉ) आयच्या काळाकडेन संबंद कसो (कसॉ) लावचो?*

16. ही फुलदाणी कुणी फोडली?
*हो (हॉ) व्हाज कोणें फोडलो (फोडलॉ)?*

17. ह्या पुस्तकाची किंमत काय?
*ह्या पुस्तकाचें मोल (मॉल) कितलें ?*

18. त्याच्या हातातून पतंगाचा दोर सुटला.
*पतंगाचें (पतंगाचँ) सूत ताच्या हातांतल्यान सुटलें (सुटलँ).*

19. हा हार कुठे करून घेतला होता?
*हो (हॉ) हार खंय करून घेतिल्लो (घेतिल्लॉ)?*

20. ज्ञानदेवांना अगदी बालपणीच साक्षात्कार झाला होता.
*ज्ञानदेवांक साप्प भुरगेपणांतच दिश्टावो जाल्लो (जाल्लॉ).*

21. कबुतर खिडकीच्या तावदानावर बसले होते.
*पारवो (पारवॉ) जनेलाच्या दारार बशिल्लो (बशिल्लॉ).*

22. मुलांना त्यांच्या भाषणाचा कंटाळा आला होता.
*भुरग्यांक तांच्या भाशणाचो (भाशणाचॉ) वाज आयिल्लो (आयिल्लॉ).*

23. तिने आपल्या दाराचा पडदा बदलला.
*तिणें आपणाल्या दाराचो (दाराचॉ) पड्डो बदल्लो (बदल्लॉ).*

24. व्याख्यानात किती वेळ गेला ते समजलेच नाही.
*व्याख्यानात कितलो (कितलॉ) वेळ गेलो (गेलॉ) तें कळ्ळेंच ना.*

25. तुमचा मोबाईल वाजतोय वाटतं.
*तुमचो (तुमचॉ) मोबायल वाजतासो (वाजतासॉ) दिसता.*

प्रकरण 4 :

## I
## कुठे - *खंय*

1. बस कुठे थांबेल?
   *बस खंय थांबतली?*

2. तुम्ही कुठे जाता?
   *तुमी खंय वतात?*

3. तुम्ही (स्त्री - पुरूषांसह) कुठे निघालात?
   *तुमी खंय चल्लीं ?*

4. तुम्ही (फक्त पुरूषांसह) कुठे निघालात?
   *तुमी खंय चल्ले?*

5. कोलव्याला जाण्यासाठी बस कुठे मिळेल?
   *कोलंव्यां वचपाक बस खंय मेळटली?*




6. देवळात कोणत्या वाटेने गेले पाहिजे?
   *देवळांत खंयचे वाटेन वचपाचें?*

7. आम्हाला आमसोलं कुठं मिळतील?
   *आमकां सोलां खंय मेळटलीं?*

8. मुंबयचे बशीचें रिझर्वेशन खंय करप?
   *मुंबईच्या बसचे रिझर्वेशन कुठे करायचे?*

9. फोंडा तालुक्यात देवळे कुठे कठे आहे?
   *फोंडा म्हालांत देवळां खंय खंय आसात?*

10. ब्रागांझा हॉलकड जायचे झाल्यास सिटी बसने कुठे उतरायचे?
*ब्रागांझा हॉलांकडेन वचपाचें जाल्यार सिटी बशींतल्यान खंयच्या स्टॉपार देंवपाचें?*

11. तुम्हाला नक्की कुठे वेदना होताहेत?
*तुमकां जूस्त खंय दखता?*

12. रेल्वे आरक्षणाची / रिझर्वेशनाची खिडकी कुठल्या प्लॅटफॉर्मवर आहे?
*रेल्वे रिझर्वेशनाचें जनेल खंयच्या प्लॅटफॉर्माचेर आसा?*

13. तुम्ही कोंकणी कुठे शिकलात?
*तुमी कोंकणी खंय शिकले?*

14. इथे चांगले मार्केट कुठे आहे? आम्हाला इथल्या काही चांगल्या गोष्टी न्यायच्या आहेत.
*हांगा बरो बाजार खंय आसा? हांगासल्ल्यो कांय बऱ्यो वस्तू आमकां व्हरच्यो आसात.*

15. इथे अमसोले, ओटंबाची सोले, फणसपोळी, तळलेले गरे वगैरे वस्तू चांगल्या मिळतात ना? कुठे मिळतील त्या?
*हांगां सोलां, वटमाचीं सोलां, साटां, तळलेले गरे बी बरेऽ मेळटात न्हय? खंय मेळत हें सगळें?*

16. गोव्यात म्हापसा, मडगाव, फोंडा येथे चांगल्या मंडी आहेत. तिथे तुम्हाला चांगल्या व स्वस्त वस्तू मिळतील.
*गोंयां म्हापश्यां, मडगांवां, फोंड्या बरे बाजार भरतात. थंय तुमकां बरे आनी सवाय जिन्नस मेळटले.*

17. हे डॉक्टर आम्हाला कुठे भेटतील?
*हो दोतोर आमकां खंय मेळटलो?*

प्रकरण 5 :

## II

## कशें - कसे ;

## *कित्याक - कशाला*

1. तुम्ही (स्त्री पुरूषांसह) कसे जाल?
   *तुमी कशीं वतलीं?*

2. आंबा कसा डझन आहे?
   *आंबो कसो डूज? / आंबो कसो डझन दिला?*

3. तुझी प्रकृती आता कशी आहे?
   *तुजी भलायकी आतां कशी आसा?*

4. तू कसा आहेस?
   *तूं कसो आसा?*

5. तू हे सामान घेऊन कशासाठी चालला आहेस?
   *तूं हें सामान घेवन कित्याखातीर वता?*

6. हा फॉर्म कसा भरायचा?
   *हो फॉर्म कसो भरप?*

7. ह्या प्रश्नाचं उत्तर कसं द्यायचं?
   *ह्या प्रस्नाची जाप कशी दिवप?*

8. तुम्ही एवढ्या लगबगीने कशाला जाता?
*तुमी इतले ताकतिकेन कित्याक वतांत?*

9. तुम्ही एवढी काळजी कशाला करता?
*तुमी इतलो हुस्को कित्याक करतात?*

10. तू आज शाळेतून घरी लवकर कशाला आलास?
*तूं आयज शाळेंतल्यान घरा बेगीन कित्याक आयलो?*

11. तिचे वडील कशाने आजारी आहेत?
*तिच्या बापायक कसलें दुयेंस जालां? तिचो बापूय कित्यान वायटकार जाला?*

12. ते मूल कशासाठी रडतेय?
*तें भुरगें कित्याक रडटा ?*

13. तुम्हाला एवढे विद्यार्थी कुठून मिळालेत?
*तुमकां इतले शिकपी कशे मेळ्ळे?*

14. नारळाचे रोप लावण्यासाठी खड्डा कुठे खणू?
*कवाथो लावपाक फोणकुल खंय मारूं?*

## III

## काय - *कितें / दें ;*

## किती - *कितली, कितलें, कितलो*

1. आता काय करूया?
   *आतां कितें करूंया?*

2. आपले / तुझे वय किती?
   *तुमची / तुजी पिराय कितली?*
   *तुमकां / तुका वर्सां कितलीं?*

3. किती वाजले हो तुमच्या घड्याळांत?
   *तुमच्या घडयाळींत कितलीं वरां जालीं?*

4. ह्या वेळी आपण इथे काय करता?
   *तुमी ह्या वेळार हांगा कितें करतात?*

5. तुम्ही ह्या ठिकाणाहून काय खरेदी कराल?
   *तुमी हे सुवातीवेल्यान कितें विकत घेतलीं?*

6. तुम्ही त्यांना काय सांगितलं होतं?
   *तुमी तांकां कितें सांगिल्लें?*

7. तिकडे काय घडले आहे?
   *थंय कितें जालां?*

8. तुम्ही मला का अडवलेत?
*तुमी म्हाका कित्याक आडायलें?*

9. तुम्हाला काय हवे आहे?
*तुमका कितें जाय?*

10. तुम्ही किती वर्षापासून गोव्यात आहात?
*तुमी केन्नासावन गोंयांत आसात?*

11. उद्या तू काय करणार आहेस?
*फाल्यां तूं कितें करतलो?*

12. मी तुला किती पैसे देऊ?
*हांव तुका कितले पयशे दिवं?*

13. तुम्ही आम्हाला काय सांगू इच्छिता?
*तुमी आमकां कितें सांगपाक सोदतात?*

14. तुम्ही इथे किती दिवस राहणार आहात?
*तुमी हांगा कितले दीस रावतले?*

15. किती वाजले?
*वरां कितलीं जालीं? / कितलीं वरां जालीं?*

16. तुला किती भावंडे आहेत?
*तुका भावडां कितलीं? / तुमी भावडां कितलीं?*

प्रकरण 7 :

## IV

## कोण - *कोण*

## कुणाला - *कोणाक*

1. ती कोण आहे? ती माझी मावशी.
   *ती कोण? ती म्हजी मावशी.*

2. हे फळ कसले आहे?
   *हें फळ कसलें?*

3. ह्या फळाचा उपयोग कुणाला होतो?
   *ह्या फळाचो उपेग कोणाक?*

4. डॉक्टरानी तुला कोणते औषध दिले?
   *दोतोरान तुका कसलें वखद दिलां?*

5. आपल्याला कुणाला भेटायचे आहे?
   *तुमकां कोणाक मेळपाचें आसा?/ तुमी कोणाक मेळूंक सोदतात?*

6. तुम्ही कोणता रंग पसंत कराल?
   *तुमकां खंयचो कोर (कॉर) आवडटलो?*
   *तुमकां खंयचो कोर (कॉर) मानवतलो?*

7. त्या ऑफिसमध्ये कोणाला भेटायचे?
   *त्या ऑफिसांत कोणाक मेळप?*

8. आईने सांगितलेल्या वस्तू कोणाकडून घेऊ?
*आईन सांगिल्ल्यो वस्तू कोणाकडसून घेवं?*

9. हे तिकीट कोणाला दाखवू?
*ही तिकेट कोणाक दाखोवं?*

10. तुम्ही कोणाला विचारून आत आलात?
*तुमी कोणाक विचारून भितर सरले?*

11. दरवाजा जवळ कोण आहे?
*कोण थंय दाराकडेन?*

12. आजच्या सभेत बोलणारे वक्ते कोण आहेत?
*आयचे सभेंतले उलोवपी कोण?*

13. हे कुणाचे चप्पल?
*हें जोतें कोणाचें / हें जोतें कोणालें?*

14. त्या मुलीचा पालक कोण?
*ते चलयेचो पालक कोण?*

प्रकरण 8 :

## विचारपूस - *वासपूस*

1. कसं काय? ठीक आहे ना?
   *कितें म्हणटा? बरे आसात मूं?*

2. देवाच्या कृपेने ठीक चाललंयं.
   *बरें चलला देवा दयेन.*

3. समाधानाची गोष्ट आहे. आपण काय घेणार? चंहा, कॉफी की सरबत?
   *आयकून बरें दिसलें. तुमी कितें घेतले? च्या, कॉफी वो सरबत?*

4. माफ करा. मी चहा, कॉफी वगैरे पीत नाही.
   *देव बरें करूं. हांव च्या, कॉफी कांयच पियेना.*

5. मला चहा चालेल.
   *म्हाका च्या दिल्यार जाता.*

6. मी आता गेल्यास चालेल का?
   *हांव आतां वचूं?*

7. हा कुठे चालला?
   *हो खंय वता?*

8. ही घरी यायची वेळ का?
   *हो वेळ घरा येवपाचो?*

9. तुला हा पत्ता ठावूक आहे काय?
*तुका हो नामो खबर आसा व्हय? / तूं हो नामो जाणा व्हय?*

10. आज वार कोणता? गुरूवार की शुक्रवार?
*आयज दीस खंयचो ? बिरेस्तार काय शुक्रार?*

11. मी ही द्राक्षे खाऊ काय?
*हांव हीं द्राक्षां (दाखो) खावं?*

12. आज तुम्ही हॉस्पीटलांत जाणार नाही काय?
*आयज तुमी ऑश्पीतलांत वचपाचे नात?*

13. कारण, माझा मित्र शेवटी वारलाच.
*कारण म्हजो इश्ट निमणेकडेन भायर पडलोच.*

14. मग आज घराबाहेरही जाणार नाही की काय?
*म्हळ्यार आयज घराभायरय सरचे नात तर?*

15. तसे नाही काही, आपण सर्वजण समुद्र किनाऱ्यावर जाणार आहोत.
*तशें कांय ना, आमी सगळीं आयज-वेळेर वतलीं.*

## प्रकरण 9 :

## वाहन, रस्ता - *वाहन, रस्तो*

1. अहो! ऑटो खाली आहे का?
   *आरे! रिक्षा रिती आसा ?*
   *एँ! रिक्षा वचपाची रे?*

2. किती माणसे बसू शकतील तुमच्या गाडीत? स्टेशनवर जायचंय.
   *कितल्या जाणांक बसूंक मेळटा तुजे गाडयेंत? स्टेशनाचेर वचपाक जाय.*

3. किती पैसे झाले? सामानाचेही 20 रूपये?
   *कितले पयशे जाले? सामानाकय 20 रुपया?*

4. गोवा पहायचाय. किती पैसे घ्याल?
   *गोंय पळोवपाक जाय. कितले घेतलो?*

5. गोवा कोंकणी अकादमीकडे जाण्याचा रस्ता माहित आहे का?
   *गोवा कोंकणी अकादेमीकडेन वचपाचो मार्ग जाणा व्हय?*

6. मला रवींद्र भवनाचा रस्ता दाखवाल का?
   *म्हाका रवींद्र भवनाची वाट दाखयशात?*

7. हो अवश्य. इथून पुढे जाऊन बाजूने वळा. तिथे उजव्या हाताला एक चॅपेल लागेल. तिथूनच सरळ पुढे दिसणारी इमारत रवींद्र भवनाची.
   *बरे भशेन! हांगासल्ल्यान मुखार वचून दावेवटेन सरात. थंय उजव्या हाताक एक कपेल दिसतलें. थंयच्यानच नीट मुखार दिसता तेंच रवींद्र भवन.*

प्रकरण 10 :

## बाजार - *बाजार*

1. ह्या बाजाराचे / मंडईचे नांव काय आहे?
   *ह्या बाजाराचें नांव कितें?*

2. ही म्हापशातील शुक्रवारची मंडी आहे.
   *हो म्हापशेंचो शुक्राराचो बाजार.*

3. इथं कसली खास वस्तू मिळते?
   *हांगा खाशेली वस्त कसली मेळटा?*

4. इथलं अळसांदे नांवाचं स्थानिक कडधान्य सुप्रसिध्द आहे. इथे मैंडोळी केळीही विकत मिळतील. शिवाय मातीच्या वस्तू, हस्तशिल्प, खारवलेली मासळी, आमसुले ही चांगली असतात.
   *हांगासल्ले अळसांदे सामके फामाद. हांगा मैंडोळीं केळीय मेळटलीं. ते भायर मातयेच्यो वस्तू, हातान केल्ल्यो वस्तू, खारें, सोलांय बी हांगा बरीं मेळटात.*

5. ह्या दागिन्याची पावती द्या. सोन्याचा भाव काय झालाय?
   *हे वस्तींची पावती दियात. भांगर कशें पवन जालां?*

6. दादा, दुकान आता बंद होणार आहे का?
   *पात्रांव, पसरो आता बंद जातलो?*

7. नाही हो. आमचे दुकान रात्री 7.30 पर्यत खुलं असतं.
   *ना बाब! आमचो पसरो रातच्या 7.30 मेरेन उगतोच आसता.*

8. या बटव्याचा भाव तुम्ही जादाच लावलेला दिसतोय: मला 125 पर्यंत देत असाल तर चार घेऊन जाईन.
*ह्या बोटव्याचो दर तुमी चडच लायला काय दिसता. म्हाका सवायश्यान एक दिता जाल्यार चार घेतां.*

9. बाई! आत्तापर्यंत 150 नच विकलेत. पण तुम्हाला 130 ला देईन.
*बाय! आतां मेरेन देडशानच-विकल्यात. पूण तुका म्हूण 130 न दिन!*

10. इथल्या स्थानिक लोकांनी बनवलेल्या वस्तू आहेत काय?
*हांगास्ल्या थळाव्या लोकांनी तयार केल्ल्यो वस्तू आसात व्हय?*

11. आज बाजारांत अळंबी भरपूर दिसतात.
*आयज बाजारांत अळमी मात भरपूर आयल्यात.*

12. एवढं असूनही स्वस्त नाही.
*इतलें आसूनय सवाय नात.*

13. इथल्या बाजारांत बांगड्या घालणारे कुठे बसतात हो?
*हांगाच्या बाजारांत कांसार खंय बसतात?*

14. परवां ह्यांनी बाजारातून चांगले पिवळे धमक केवडे आणले होते.
*पयर हांणी / आमगेल्यांनी बाजारांतल्यान सामको हळ्डुवोच* हातो *कवासो हाडिल्लो.*

प्रकरण 11 :

## शिंप्याचे दुकान - *आल्फियादाचें दुकान*

1. काय शिवायचें आहे साहेब?
   *बाब/ पात्रांव कितें शिवपाचें आसा?*

2. मला एक शर्ट आणि पायजमा शिवायचाय. मापे घ्या.
   *म्हाका एक शर्ट आनी पिजाम शिवपाची आसा. जोखां काड.*

3. शर्टाची कॉलर जास्ती मोठी ठेवू नका.
   *शर्टाची कॉलर चड व्हड धरूं नाका !*

4. ही मापाची पॅण्ट कंबरेवर जरा घट्ट होते, अन उंचीला कमी आहे.
   *ही जोखाची पॅण्ट कमरार मातशी घट्ट जाता आनी लांबायेन मोटवी आसा.*

5. शर्टाची शिलाई केवढी घेतात इथे? सूट केवढ्या किंमतीत शिवता तुम्ही?
   *शर्टाची शिलाय कितली? (वा शर्टाची फेती कितली?)*
   *तुमी सूट /फात कितले भितर शिंवून दितात? (सुटाक कितले पयशे?)*

6. पॅण्टीला 130 रूपये आणि सूट दोन हजार.
   *पॅण्टीक 130 रुपया आनी सुटाक दोन हजार.*

7. कधी मिळतील कपडे? गुरूवारच्या आधी मिळतील ना?
   *कपडे केन्ना मेळटले? बिरेस्ताराच्या आदी मेळत मूं?*

8. एका सलवार कमीजला किती मीटर कापड लागेल?
*एका सलवार कमिजाक कपडो कितलो मिटर लागता?*

9. तुमच्या उंची प्रमाणे साडेचार मीटर लागेल.
*तुमचे लांबायेक साडेचार मिटर पुरो.*

10. माझ्या शर्टाला दोन काजां करून बटणं लावायला हवीत.
*म्हज्या शर्टाक दोन काजां करूंन बुतांव लावपाक जाय.*

11. तुमच्या दुकानात कपड्याना रफू करून मिळेल काय?
*तुमचेकडेन कपडे रफ् करून मेळत?*

12. हा शर्ट न पॅण्ट आता वापरता येतील.
*हो शर्ट आनी पॅण्ट आतां वापरूंक जातलीं.*

13. लहान बाळाचे कपडे शिवून द्यायला किती दिवस घ्याल?
*माणकुल्या भुरग्याचे कपडे/मुस्तायकी शिवून दिवपाक कितले दीस लागतीत?*

## संकीर्ण वाक्यां

1. असे वागताना तुम्हाला भीड-मुर्वत काहीच कशी वाटत नाही?
*अशे वागताना तुमी मात भीड-मुर्वत कशी दवरिना?*

2. माणसाने नेहमीच नम्रतेने हाक द्यायला हवी.
*मनशान सदांच नमळकायेन हटकुवपाक जाय.*

3. उगाचच आवाज कशाला वाढवता, साधे सुधे बोलतानाही?
*ओग्गी आवाज कित्याक चडयता, साद्यासुद्या उोवण्यांतय?*

प्रकरण 12 :

## उपहारगृह - *खानावळ*

1. रविवारी लोक बाहेर जातात काय?
   *आयतारा लोक भायर वतात?*

2. हो. सुट्टीच्या दिवशी त्यांना बाहेर जायला आवडते.
   *हय. सुटयेच्या दिसा तांकां भायर वचपाक मानवता.*

3. इथे एकही टेबल खाली नाही. मला तर कडकडून भूक लागलीय.
   *हांगां एकय मेज रितें ना. म्हाका सामकी सणसणीत भूक लागल्या.*

4. तुम्ही ए.सी. केबीनमध्ये चला ना.
   *तुमी ए. सी. केबीनांत वचात.*

5. अहो मला तहान लागलीय. पाणी द्या ना थोडं.
   *ए! म्हाका तान लागल्या. इल्लें उदक दिता?*

6. इथं खायला काय मिळतंय. गोव्याची खासीयत काय आहे?
   *हांगा खावपाक कितें मेळटा?*
   *हांगां खावपाक कितें आसा? गोंयचें खाशेलेपण कितें ?*

7. पातळ रश्शाचो भाजी आनी पाव. नाही तर मिरची भजी किंवा बटाटेवडा साहेब!
   *पातळ भाजी आनी उंडो (पाव) ना जाल्यार मिरची आनी बटाटवडो पात्रांव!*

8. चहा किती गार आहे. मला दुसरा चहा आण आनी थोडी साखर सुध्दा.
   *च्या कितली थंड. म्हाका दुसरी च्या हाड. आनी इल्ली साखरय.*

9. जेवणाची थाळी कशी? रात्रीचं जेवण किती वाजेपर्यंत असते?
*जेवणाचे / थाळयेचे कितले? रातचें जेवण केन्ना मेरेन मेळटा?*

10. शाकाहारी प्लेटला किती पैसे? मांसाहारी जेवणही इथेच मिळेल काय?
*शिवराक जेवणाचे कितले पयशे? नुस्त्याचेंय जेवण हांगाच मेळटा?*

11. माशांच्या पदार्थांत खास गोव्याचा पदार्थ कोणता?
*नुस्त्याच्या जिनसांत खासां गोंयचो असो जिनस खंयचो?*

12. बांगड्यांची उड्डामेथी हा पदाथ खास गोवनच आहे.
*बांगड्यांची हुड्डमेथी हो गोंयचो खाशेलो जिनस.*

13. थाळीत चपाती मिळते का नुसता भातच? पुलाव नकोय मला.
*थाळयेंत चपाती मेळटा काय फक्त शीत? पुलाव नाका म्हाका.*

14. चपाती बरोबर भाजी आनी चांगल्या दह्याची एक वाटी आण.
*चपाते वांगडा भाजी आनी करकरीत धंयाची एक वाटी हाड.*

15. अंड्याचे ऑम्लेट आणि ब्रेडबरोबर थोडं लोणो किंवा लोणचं मिळेल का?
*तांतयाची ऑम्लेट आनी पावावांगडा इल्लें लोणी वा लोणचें मेळत?*

16. तुम्हाला आंब्याचे लोणच हवे की लिंबाचे लोणचे चालेल?
*तुमकां आंम्याचें लोणचें जाय काय लिंबाचें?*

17. ह्या हॉटेलात स्वच्छता आहे. टापटीपपणा आहे. शिस्त आहे. छान आहे हे हॉटेल. दुसऱ्यावेळी यायला आवडेल मला.
*हांगां नितळसाणय आसा. टापटीपपणा आसा. शिस्त आसा. बरें दिसलें हें हॉटेल. दुसरे फावटीय हांगां येवपाक मानवतलें.*

18. इथे शाकाहारी जेवणासाठी कोणते चांगले हॉटेल आहे?
*हांगां शिवराक जेवणाखातीर खंयचें बरें हॉटेल आसा?*

19. तशी चांगली हॉटेलं खूप आहेत. पण चांगलं न स्वच्छ शाकाहारी जेवण उडपी हॉटेलांत घ्या.
*तशीं आसात खूब बरीं हॉटेलां. 'पूण बरें आनी नितळ शिवराक जेवण जेवतले जाल्यार उडप्याच्या हॉटेलांनी वचात.*

20. खास गोमंतकिय पध्दतीच्या जेवणात काय असते? कुठं मिळेल ते आम्हाला?
*खास गोंयचे पध्दतीचे जेवणांत कितें आसता? खंय मेळत तें आमकां?*

21. माशांची आमटी, भात, 'तळलेले मासे आणि आमसूलाची कडी.
*नुस्त्याचें हुमण, शीत, तळिल्लें नुस्तें आनी सोलां कडी.*

22. मला माडाची नीरा घातलेला पाव हवा आहे.
*म्हाका सूर घातिल्लो उंडो जाय.*

23. इथे काजुची दारू मिळेल काय?
*हांगा काजुची फेणी मेळत?*

24. आम्ही मद्ये विकत नाही.
*आमी सोरो विकीनात.*

25. मद्ये/दारु मुळे प्रकृती बिघडते.
सोऱ्यान भलायकी इबाडटा.

## प्रकरण 13 :

# रेल्वे स्टेशन/प्रवास - *रेल्वे स्टेशन/भोंवडी*

1. मडगांवचे रेल्वे स्टेशन फोंड्याहून किती दूर आहे?
   *मडगांवचे स्टेशन फोंड्यासावन कितलें पयस आसा?*

2. जास्त नाही. असेल फक्त 12-13 कि.मी..
   *चड ना. फकत 12-13 कि.मी. आसत.*

3. मला तिथूनच गाडी पकडायची आहे.
   *म्हाका थंयच्यानच गाडी धरपाची आसा.*

4. तिथे जायला किती पैसे लागतील?
   *थंय वचपाक पयशे कितले लागतले?*

5. हमाल! माझं सामान गाडीत चढवायचं आहे.
   *ए हमाल! म्हगेलें सामान गाडयेंत चडोवपाचें आसा.*

6. गोवा एक्सप्रेसने जायचंय. गाडी प्लॅटफॉर्मवंर आली ना?
   *गोवा एक्सप्रेसीन वचपाचें आसा. आयली गाडी प्लॅटफॉर्माचेर?*

7. गाडी दीड तास लेट आहे आणि ती प्लॅटफॉर्म नं. 5 वर येईल.
   *गाडी देडवर लेट आसा आनी ती प्लॅटफॉर्म नं. 5 चेर येतली.*

8. अहो! निजामुद्दीनचे दुसऱ्या वर्गाचे तिकीट द्या ना.
   *पात्रांव! निजामुद्दीनीचें दुसऱ्या वर्गाचें तिकीट दियात पळोवया.*

9. जरा थांबा! मला कंप्युटरवर रिझर्वेशन तक्ता बघू द्या.
*मातसो राव! कंप्युटराचेर रिझर्वेशन तकटो पळयतां.*

10. सॉरी. तुम्हाला हव्या त्या तारखेचे रिझर्वेशन मिळणार नाही.
*सॉरी. तुमकां जाय ते तारखेचें रिझर्वेशन मेळचें ना.*

11. तसं असेल तर त्याच्या पुढच्या आठवड्यातली दोन नॉन ए.सी. ची तिकीटं चालतील. किती पैसे द्यावे लागतील?
*तशें जाल्यार ताच्या मुखावेल्या सप्तकांतली दोन नॉन ए.सी. तिकेटी दिल्यार जाता. कितले पयशे दिवंचे पडटले?*

12. वेटींग रूम कुठे आहे?
*वेटींग रूम खंय आसा?*



प्रकरण 14 :

## हॉटेल, निवास पर्यटन व सांस्कृतिक चौकशी
## *हॉटेल, राबितो, पर्यटन आनी सांस्कृतीक चौकशी*

1. आपण ह्या हॉटेलाचे मॅनेजर का? इथे एका रात्रीपुरती रहायला एक खोली मिळेल का?
   *तुमी ह्या हॉटेलाचे मॅनेजर? हांगां एके राती खातीर कूड मेळत?*

2. आपल्याला कसली रूम हवी? सिंगल, डबल, एसी, नॉन एसी?
   *तुमकां कसलो रूम जाय? सिंगल, डबल, एसी, नॉन एसी?*

3. अरे! मला ही तळमजल्यावरची खोली नको. तिथे 'प्रायवसी' नसते.
   *म्हाका ही तळमजल्यावेली कूड नाका. थंय 'प्रायवसी' नासता.*

4. मला कुणाचा फोन आल्यास माझ्या खोलीत द्याल ना?
   *म्हाका कोणाचोय फोन आयल्यार म्हजे कुडींत दियशात न्हय?*

5. मी संध्याकाळी बाहेर जातोय. ही चावी ठेवा. माझा मुलगा संध्याकाळी येईल. त्याच्यापाशी ती दिल्यास चालेल.
   *हांव भायर सरता. ही चावी दवरात. म्हजो चलो सांजे येतलो तेन्ना ताचेकडेन ती दिल्यार जाता.*

6. आम्ही उद्या आठ वाजता खोली सोडणार आहोत आम्हाला सहा वाजता उठवाल ना? सात वाजता चहा वर खोलीतच पाठवल्यास चालेल.
   *फाल्यां आमी आठ वरांचेर रूम सोडटलीं. आमकां स वरांचेर उठयशात? च्या सात वरांचेर कुडींतच धाडल्यार पुरो.*

7. मला हे हॉटेल खूब आवडल. मी पूर्वीही इथेच राहिले होते.
   *म्हाका हें हॉटेल खूब्ब आवडलें. हांव आदींय हांगाच राविल्लीं.*

8. गोव्यात काय पाहण्यासारखं आहे? इथे गोवा पाहण्यासाठी 'गोवा दर्शन' वगैरे पॅकेज टूर्स आहेत का?
*गोयांत कितें पळोवपासारकें आसा? हांगा 'गोंय दर्शन' बी अशे कितें पॅकेज टूर्स आसात?*

9. इथे फोंडा तालुक्यात बघण्यासारखी देवळे आहेत. शिवाय उत्तर गोवा व दक्षिण गोवा दोन्ही ठिकाणी चांगले समुद्रकिनारे आहेत.
*हांगां फोंड्या तालुक्यांत पळोवपासारकीं देवळां आसात. तेभायर उत्तर गोंय आनी दक्षिण गोंयात बऱ्यो दर्या वेळो आसात.*

10. इथे शिमगा कधी खेळतात? त्याला शिमगाच म्हणतात काय?
*हांगां शिगमो केन्ना जाता? ताका शिगमोच म्हणटात?*

11. इथे फाल्गुन महिन्यांत जो शिमगा खेळतात त्याला कोंकणीत 'शिगमो' असे म्हणतात.
*हांगां फाल्गुन म्हयन्यांत 'शिगमो' खेळटात ताका कोंकणींत शिगमो अशें म्हणटात.*

12. गोव्यात दिवाळी सणाचे स्वरूप कसे आहे?
*गोंयच्या दिवाळी परबेचें स्वरूप कशें आसा?*

13. गोव्यातील दिवाळो सणाचे दोन प्रकार आहेत.
*गोंयच्या दिवाळी परबेचे दोन प्रकार आसात.*

14. कोणते बरे?
*खंयचे ते?*

15. गोव्यातील तळशी लग्नाच्या सणा 'व्हडली दिवाळी' असे संबोधतात तर नरक चर्तुर्थीला 'धाकली दिवाळी'!
*गोयांतल्या तुळशी लग्नाचे परबेक 'व्हडली दिवाळी' अशें म्हणटात जाल्यार नरक चतुर्थीक 'धाकली दिवाळी'!*

प्रकरण 15 :

## न्हाव्याचे दुकान - *म्हाल्याचो शाप*

1. हजामतीचे किती पैसे द्यावे लागतील?
   *केंस मारूंक कितले पैशे दिवचे लागतले?*

2. माझे केस कापायचेत. दाढीपण केल्यास चालेल.
   *म्हजे केंस मारूंक जाय. खाडय केल्यार चलता.*

3. तुम्हाला तर टक्कल पडले आहे, कुठले केस कापू?
   *तुमकां तर खरड पडलां, खंयचे केंस कापू?*

4. ह्या मुलाचे केस अगदी बारीक कापा बरे! मशीनने मात्र नको.
   *ह्या भुरग्याचे केंस सामके बारीक कर. मशीनान मात नाका.*

5. केस कापल्यानंतर जरा डोक्याला मालिश करून द्याल ना.
   *केस मारतकच मातशें तकलेक मालिश करशीत मूं?*

6. माझ्या मिशीचा कट जरा नीटपणे करून द्या.
   *म्हज्यो मिश्यो मातश्यो सारक्यो करून दी.*

7. दाढी करताना बोथट वस्तरा वापरू नका. गाल चुरचुरतात त्याने.
   *खाड काडटना धार नाशिल्लो वाखर नाका. ताणें गाल चुरचुरतात.*

8. माझ्या केसांना जरा 'यू' आकार दिल्यास ते बरे दिसतील ना?
   *म्हजे केंस 'यू' शेपीन कापल्यार बरे दिसतले न्हय?*

प्रकरण 16 :

## धोबी - *मडवळ*

1. कपडे धुण्याचे दर काय आहेत?
   *कपडे धुवपाक कितले घेतात?*

2. धुवायला दिलेले कपडे किती दिवसांनी परत मिळतात?
   *धुवपाक दिल्ले कपडे कितल्या दिसांनी परतून मेळटात?*

3. आज दिल्यास चौथ्या दिवशी मिळतील. धुतलेले कपडे आणल्यास लगेच इस्त्री करून देऊ.
   *आयज दिल्यार चवथ्या दिसा मेळटले. धुल्ले कपडे हाडल्यार रोखडेच फेर्र मारून दिता.*

4. तुम्ही घरी येऊन कपडे घेऊन जाल का? डझनाचा, शेंकड्याचा भाव किती? कपड्यांच्या प्रकाराप्रमाणे भाव का?
   *तुमी घरा येवन कपडे व्हरशात? डझनाक, शेकड्याक कितले पयशे घेतात? कपड्यांच्या प्रकाराप्रमाण दर?*

5. ठरल्याप्रमाणे तुम्ही वेळेवर कपडे आणून नाही देत. आम्हाला परवा लग्नाला जायचं होतं.
   *थारायिल्ल्याप्रमाण तूं वेळार कपडे हाडून दिना. आमकां पयर लग्नाक वचपाचें आशिल्लें.*

6. या साडीवर हे कसले डाग? ती परत घेऊन चला न नीट काळजीपूर्वक धुवा.
   *साडये हीं कसलीं खतां ? पर्थून व्हरून जतनायेन सारखी धुवून हाड पळोवया.*

